

# अमेरिकन स्वातंत्र्याच्या साहस कथा

**मराठी अनुवाद - पल्लवी सतीश पाटील**

-अमेरिकेतील गुलामी

- भुयारी रेलमार्ग

-१९६३ ची स्वातंत्र्य चळवळ

# अमेरिकेन स्वातंत्र्याच्या साहस कथा -
# स्वातंत्र्यासाठी उठलेला आवाज

-अमेरिकेतील गुलामी

- भुयारी रेल्वे मार्ग

-१९६३ ची स्वातंत्र्य चळवळ

मराठी अनुवाद - पल्लवी सतीश पाटील



# अनुक्रमणिका

# ऐकणारे

## - अमेरिकेतील गुलामी



लेखनः ग्लोरिया व्हेलन

चित्रांकन: माइक बैनी

भाषांतर: पल्लवी सतीश पाटील

सकाळी जेव्हा अधिकारी (गुलामांचा निरीक्षक) बाजा वाजवतो, तेव्हा काळा-कुट्ट अंधार असतो. तरीही आम्हाला झटपट अंथरुणातून उठावंच लागतं.

माझे मित्र बॉबी आणि सू खूपच लहान असल्यामुळे ते माझ्यासारखे कापूस वेचायला येऊ शकत नाहीत. त्याऐवजी सू जनावरांना गोठ्यात दूध काढण्यासाठी घेऊन जातो. आणि लहान बछड्यांची देखभाल करण्यासाठीही तो वडीलधाऱ्यांची मदत करतो.

दिवसभर अथक परिश्रम करून संध्याकाळीच आम्ही घरी परततो. पण  बॉबी, सू , मला आणि एला मे ला मात्र रात्रीच्या जेवणानंतर सुद्धा काम करावं लागतं.

आम्हाला निमूटपणे ऐकावं लागतं.

पोटात उकडलेली रताळी आणि जिभेवर गुळाचा तुकडा ठेवून आम्ही पुन्हा कामाला लागतो.

बड्या घरातील मालक- मालकीण आम्हा गुलामांशी काही बोलत नाहीत. काम करत असताना आमच्या कानावर पडणाऱ्या नव्या घडामोडी घरी येऊन आम्ही आई-बाबांना सांगतो.

रात्रीच्या अंधारात काजवे लुकलुकत आहेत. बॉबी,सू, मी आणि एला मे स्वतःला कापसाच्या सरकी पेक्षाही छोटं आणि सावली सारखं शांत ठेवून  घराच्या खिडकी जवळील झाडामागे लपून त्यांना न्याहाळत आहोत.

खिडकीचे पडदे वाऱ्याच्या झुळूके सोबत डोलत आहेत. रात्रीच्या काळोखात डास डंख मारत आहेत पण आम्ही कुणीच त्यांना एखादी चापट सुद्‌धा मारत नाही.

आम्ही इथे शांत पणे ऐकण्यासाठीच तर आलो आहोत.



मालक थॉमस, मालकीण लुईस आणि त्यांची मुलं - छोटे मालक जॉन आणि छोटी मालकीण ग्रेस, संधिप्रकाशात आनंद लुटत आहेत. छोटी मालकीण ग्रेस पियानो वाजवत आहे. संगीत एकही शब्द न बोलता आमच्याशी संवाद साधत आहे. मधुर संगीत आम्हाला कुठे दूर भरकटत नेईल या भीतीने आम्ही सवंगडी एकमेकांचे हात हातात घेऊन  बसलो आहोत.

आम्हा गुलामांना आता एका नव्या मालकाच्या हाती सोपवले जाणार असल्याचे, मालक मालकिणीला सांगत आहेत. नकळत माझ्या ओठांवर हास्य उमटलं, मला सध्याचा मालक अजिबात आवडत नाही. कापूस वेचताना थोडासा जरी वेळ लागला तर ते वेताच्या छडीने फट्टाक करून आमच्या पायावर एक जोरदार वार लगावून देतात.

बॉबी, सू, मी आणि एला मे, ही नवी बातमी सांगण्यासाठी झटकन घराच्या दिशेने धाव घेतो.

मालक बदलणार हे कळताच आमच्या आई-माई पण आनंदाने उड्या मारू लागतात. पण वडिलांचे मात्र असे म्हणणे होते की, " जोपर्यंत नवीन मालक कसा आहे हे अनुभवत नाही, तोपर्यंत तरी मी काही टाळ्या वाजवून आनंदी होऊ शकत नाही. "

सकाळी सूर्य उगवताच सूर्या सोबत माझे ही काम सुरु होते. आई-बाबांसोबत मी कापूस वेचण्याचे काम करते ना !



कपाशीचे छोटे काटे माझ्या बोटांत रुततात पण आम्हाला पहाटेच्या थंडीतही जोमाने काम करावे लागते. एकदा तर बाबांनी एकट्यानेच चक्क २०० किलो कापूस एका दिवसात गोळा केला होता.

दुपार होत आहे, जेवणाची वेळ झाली आहे. आम्हा लहानग्यांसाठी लाकडाची बादली आणि शिंपल्यांचा चमचा आहे.

आज जेवणात आमच्यासाठी डुकराचे मांस, मक्याचे रोठ आणि सोबत चवळीच्या शेंगांची आमटी आहे. आम्ही तोपर्यंत खात राहतो जोपर्यंत आमचे पोट सश्यासारखे टुम्म फुगत नाही.

दुपारच्या उन्हात मी मेणासारखी वितळत आहे त्यामुळे मी फारसा कापूस वेचू शकत नाहीये. माझी अवस्था पाहून बाबांनी लगेच माझ्या रिकाम्या टोपली मध्ये त्यांनी वेचलेला कापूस भरला.



त्या रात्री आम्ही बड्या घरातील मालकांना बोलताना ऐकलं, " स्पेन्सर कडे कामगार गुलामांची कमतरता आहे. त्याने मला विलियम ला विकत देण्याची विनंती केली आहे."

विलियम! ते तर माझे बाबा आहेत!!

त्यांचे नाव ऐकताच माझ्या ह्रदयाची धडधड वाढली. पण मी तरीही त्यांचे पुढचे शब्द कान लावून ऐकत आहे- " मला नाही वाटत की मी त्याला सहजासहजी जाऊ देऊ शकतो. तो कामांत खूप कुशल आहे. त्याला यंत्रं पण चालवता येतात. किंबहुना मी तर त्याला आता कापूस पिंजणाऱ्या मशीन ची योग्य देखभाल आणि दुरुस्ती कशी करायची हे पण शिकवणार आहे.", मालक म्हणतात.

हे ऐकताच मी सुटकेचा निःश्वास सोडला आणि सू ला अलगद मिठी मारली. त्याच्या वडिलांना मागच्या वर्षी विकले होते, तेव्हापासून त्याने आपल्या वडिलांना पाहिले सुद्धा नाही.

घरी जाऊन सर्वप्रथम मी बाबांना कडकडून मिठी मारते आणि जे काही ऐकलं ते सर्व सांगते.





आज शनिवार ची रात्र आहे. नेहमीप्रमाणे आई आमचे मळके कपडे धुते आणि आम्हाला अंघोळ घालताना तर इतकं रगड-रगड रगडते की आमची त्वचाच पार सोलून निघावी. ही सगळी तयारी आम्हाला चर्च मध्ये नेण्यासाठी चालू असते.

आम्ही वर बालकनी मध्ये बसतो आणि सर्व श्वेतवर्णीय मालक खाली. जेव्हा "अमेझिंग ग्रेस" प्रार्थना गायली जाते तेव्हा आम्ही सर्व श्वेत आणि गौर वर्णीय एकत्रित पणे एका सुरात गातो. दुपारी आम्ही मुलं जंगलात जातो. आमच्या चर्च चे छत म्हणजे शुभ्र निळे आकाश आणि फर्शी म्हणून हिरवं गवत.

आमचे स्वतंत्र पाद्री (धर्मोपदेशक) आहेत जे आम्हाला मोझेस च्या गोष्टी ऐकवतात- ज्यांनी इस्राइल च्या नागरिकांना स्वातंत्र्य मिळवून दिले होते. " परमेश्वर आपल्याला पण स्वातंत्र्य देईल " ते आश्वासन देतात. "ज्युबिली (अमेरिकन यादवी युद्धानंतर स्वातंत्र्याचा आनंदोत्सव) लवकरच येणार आहे" असे ते म्हणतात.

आम्ही सर्वांनी मिळून प्रार्थना केली. विशेषतः 'ऑल गॉड्स चिल्ड्रेन गॉट विंग्स' (ईश्वराच्या सर्व मुलांना पंख आहेत) आणि 'स्टॅन्ड स्टिल जॉर्डन' (तू अटळ रहा जॉर्डन) या प्रार्थना आम्ही गुलाम सर्व श्वेत वर्णियांपेक्षा मोठ्या आवाज़ात गातो- जेणेकरून आमचा आवाज ईश्वरापर्यंत पोहोचेल. मी अशा करते की परमेश्वर ऐकत असेल.

आम्ही आमच्या बॉस ला मोठ्या मालकांशी बोलताना ऐकलं, " जर कुदळी ऐवजी नांगर आणि काही घोडे खरेदी केले तर काम अधिक जोमाने होईल. " ही गोष्ट आम्हाला पण पटली. कारण कुदळीने शेती करणं खरंच खूप कठीण काम आहे.

पण मालक म्हणतात की ते काही नांगर-बिंगर खरेदी करणार नाहीत. त्यांच्या मते, "गुलाम घोड्यांपेक्षा स्वस्त पडतात."

आज मोठ्या मालकांच्या घरात प्रत्येक मेणबत्ती तेवत आहे- जणूकाही कुणी सूर्यच टांगून ठेवला आहे! वायोलिन चे मधुर सूर खिडकीतून बाहेर झेपावत आहेत.

बॉबी, सू, मी आणि एला मे संगीताच्या तालावर तोपर्यंत नाचतो जोपर्यंत दवबिंदूनी आमची पावलं ओली होत नाहीत. आम्ही इतके आनंदी आहोत की वेताच्या छडीच्या भीतीने डगमगणारे आमचे हृदय आम्हाला हे सुद्धा कळू देत नाही की आता घरी जाण्याची वेळ झाली आहे.





परमेश्वराच्या कृपेने अखेर सर्व कापूस वेचला गेला आहे. आज मी Jumper बनून वडिलांना मदत करणार आहे - कापसाने भरलेल्या एका गाठोड्यात आम्ही घुसतो आणि त्यावर जोरजोरात उड्या मारतो.

टर्की ट्रॉट आणि मेरी जेन ही गाणी गुणगुणत मी आनंदाने त्या कापसाच्या भल्या मोठ्या ढिगाऱ्यावर नाचते. सुरुवातीला तर कापूस माझ्या बोटांना मऊ लागतो पण जेव्हा आम्ही उड्या मारणे थांबवतो तेव्हा गाठोड्यातील कापूस गोळा होऊन व  एकमेकांवर दाबला जाऊन घट्ट लादी बनलेला असतो.

त्याच रात्री आम्ही मालकीण लुईस यांना मालक थॉमस यांच्याशी बोलताना ऐकले की, "मी या गुलाम मुलांसाठी शाळा सुरु केली तर?" मालक उत्तर देतात, "काहीतरीच काय ! गुलामांना लिहायला वाचायला शिकवणं गुन्हा आहे."

ज्या मॅडम छोटी मालकीण ग्रेस ला शिकवण्यासाठी येतात त्यांनी एक कविता छोटी मालकीण ग्रेस यांना पाठ करायला सांगितली आहे. छोटी मालकीण ग्रेस ही कविता पुन्हा पुन्हा वाचून आपल्या आई ला ऐकवतात -

*तुझ्यासाठी बनवेन मी गुलाबांचा बिछाना*
*हजार सुगंधी पुष्पगुच्छांचा दागिना*
*फुलांचा मुकुट आणि एक लेहंगा*
*मोगऱ्याच्या पानांनी चहुबाजूने गुरफटलेला*

मला गुलाब आणि मोगऱ्याचं झाड तर माहिती आहे पण लेहंगा म्हणजे काय? बॉबी आणि सू ला पण त्याचा अर्थ नाही कळाला. मी घरी जात असताना ही कविता गुणगुणत होते. आता ती माझी ही कविता आहे.

जेव्हा मी झोपण्यासाठी माझ्या गवताच्या काड्यांनी बनविलेल्या बोचट बिछान्यावर पडते तेव्हा माझ्या कल्पनेत तो गुलाबाच्या मऊ आणि सुगंधी पाकळ्यांनी सजवलेला असतो.

हिवाळा येणार असेल तेव्हा आम्हाला उबदार कपडे दिले जातात. बॉबी ला एक सदरा मिळाला आहे. सू आणि मला चौकडांचा ड्रेस आणि चड्ड्या मिळाल्या आहेत. पण नवीन बूट नाही. त्यामुळे माझ्या पायांची भेगा पडलेली बोटे खूपच नाराज आहेत.

मास्तर थॉमस यांना कडक वर्दी मध्ये - ज्याला पितळेची बटणे आहेत आणि कमरेला तलवार आहे , मोठ्या मालकांकडे  येताना पाहिले. त्यांना पाहून चिंतीत चेहऱ्याने बाबा आम्हाला म्हणाले, " एला मे, तुला, बॉबी आणि सू ला आज रात्री खूप लक्ष देऊन सर्व ऐकावं लागेल. काहीतरी अघटित होणार आहे असे वाटत आहे.

मालक थॉमस आपल्यावर नाराज दिसत आहेत. त्यांचे शब्द हे फुरसे सापाच्या फुत्काराप्रमाणे घुमतात आणि त्याच्या जालीम विषाप्रमाणे जीवावर बेततात."

 "आश्चर्याची गोष्ट आहे की अब्राहम लिंकन यांना राष्ट्रपती म्हणून निवडले आहे.", मालक मास्तर थॉमस यांना नाराजीच्या सुरात उत्तर देतात. "तो इसम माथेफिरू आहे. म्हणे गुलामी गुन्हा आहे आणि ती नष्ट झाली पाहिजे!"

त्यांचे हे संभाषण ऐकताच  बॉबी, सू , मी आणि एला मे पटकन घराच्या दिशेने धाव घेतो.





आई-बाबा आमच्या आस पास गोळा झाले तेव्हा आम्ही त्यांना सांगितले की, " आपल्याला नवीन राष्ट्रपती मिळाले आहेत, अब्राहम लिंकन"

हे ऐकताच आनंदाने बाबा म्हणतात, " उत्सव येत आहे. इस्राइल प्रमाणे आपल्याला ही लवकरच स्वातंत्र्य मिळेल. स्वातंत्र्याचा आनंदोत्सव साजरा करण्याची वेळ आता जवळ आहे."

मी वडिलांना विचारले ," म्हणजे आता आमचे इथून पुढे निमूट पणे उभे राहून गुपचूप ऐकणे बंद होणार? खरंच?"

बाबा उत्तर देतात, " आपल्याला मार्ग तर दिसत आहे पण तो कुठे संपतो हे माहिती नाही. आपल्याला हे जाणून घ्यावे लागेल की किती दूर या रस्त्यावर चालावे लागेल आणि हा रस्ता कसा पार करावा. बॉबी, सू आणि तुझं ऐकण्याचं खरं काम तर आत्ता सुरु झाले आहे."

# लेखिकेच्या लेखणीतून

## - ग्लोरिया व्हेलन

गुलामांचे जीवन अशा परिस्थितींवर अवलंबून होते ज्या त्यांच्या हाताबाहेर होत्या. ते कुणासाठी आणि कुठे गुलामी करतील यावर त्यांचे काहीच नियंत्रण न्हवते. कुठल्या क्षणी त्यांना आपल्या आई, वडील, मुले, पती आणि पत्नी पासून वेगळे केले जाईल याची त्यांना कानोकान खबर नसे.

आपल्या नशिबाबद्दल काय निर्णय घेतला जातोय हे जाणून घेण्यासाठी ते लहान मुलांना आपल्या मालकांच्या घरातील खिडक्यांच्या मागे दडून आतील गोष्टी लक्षपूर्वक ऐकण्यास सांगायचे.

लेखक पण श्रोता असतात. त्यामुळेच तर त्यांच्या लेखनाचा प्रेरणा स्रोत गोष्टी असतात. या गोष्टी लेखकांनी कधी अशा लोकांकडून ऐकल्या असतात ज्यांचा तो जीवित अनुभव असतो. किंवा कधी ते असे शब्द ऐकतात जे कोणे एके काळी कुणीतरी पुस्तकांमध्ये लिहून ठेवलेले असतात.

लेखक पण हेच करतात- ते पण बॉबी, सू आणि एला मे प्रमाणे ऐकत असतात आणि या ऐकलेल्या जिवंत कहाण्या इतरांपर्यंत पोहोचवतात.



# स्वातंत्र्याच्या नदीवर एक मित्र

## - भुयारी रेल्वे मार्ग



लेखनः ग्लोरिया व्हेलन

चित्रांकन: हाइसबर्ट फॉन फ्रैंकनहायज़न

भाषांतर: पल्लवी सतीश पाटील

लूई ने चतुरंग बदकाला (मलार्ड बदकाला) पाण्यातून आकाशाकडे झेप घेताना पाहिले. लवकरच डेट्रॉइट नदी वर बर्फ़ाची चादर पसरणार होती.

लूई ने मासेमारीसाठी वापरल्या जाणाऱ्या होडीला नदी किनारी उलटं करून ठेवलं होतं - जेणेकरून तिला बर्फात बुडण्या पासून वाचवले जावे. त्याचे वडील पण नेहमी हेच करायचे. ते हिवाळ्यासाठी उत्तरेकडील लाकूडतोड्यांच्या शिबिरात काम करण्यासाठी गेले होते. जाण्यापूर्वी त्यांनी लुई ला सांगितले - " बेटा, तू शेत नीट सांभाळ. जर कधी तुला कधी काही अडचण आली तर स्वतःला हे विचार की या परिस्थिती मध्ये जर बाबा असते तर त्यांनी काय केले असते?"

बर्फ़ाळ डिसेंबर महिन्यात सूचिपर्णी वृक्ष पूर्णतः श्वेत रंगाने नहाले होते आणि नाशपती ची पानगळ सुरु झाली होती. लूई च्या आजी-आजोबांनी फ्रांस वरून अमेरिकेला येताना ही झाडे आपल्या सोबत आणली होती. तिकडे डेट्रॉइट नदीवर वाफेने चालणाऱ्या बोटी आणि शिडाची जहाजे हिवाळ्यातील बर्फाला भेदून समुद्राच्या दिशेने सरकत होत्या.

इतक्यातच बदामाच्या झाडांमधून अचानक पानांची सळसळ ऐकू आली. लूई ने विचार केला, हरिण किंवा लांडगा असावा.

अचानक कानात कोणीतरी कुजबुजलं, " तू मित्र आहेस?"

लूई इतका गडबडून गेला की त्याची नाव च उलटी झाली. त्या शब्दांचा एकाच अर्थ असू शकतो, ' निर्वासित गुलाम '

त्याने याचे उत्तर लूई ने अगदी त्याच शब्दांत दिले जसे त्याच्या वडिलांनी शिकवले होते.

"तुम्ही कशाच्या शोधात आहात?"

"स्वातंत्र्य"

"तुमच्यामध्ये आस्था आहे?"

"माझ्या मनात आशा आहे."

विटाळलेल्या शॉल मध्ये गुरफटलेली एक गौरवर्णीय स्त्री झुडुपांमधून बाहेर आली.  एक छोटीशी मुलगी तिला कवटाळून उभी होती. त्यांच्यापासून थोड्याच अंतरावर लूई च्या वयाचा एक मुलगा ही होता - साधारणतः १२ ते १३ वर्षांचा.

"परमेश्वराची तुझ्यावर सदैव कृपा राहू दे" ती महिला म्हणाली. "माझे नाव सारा आहे. ही माझी मुलगी लूसी आणि मुलगा टायलर. डेट्रॉइट च्या बॅप्टिस्ट चर्च मध्ये मला सांगितले होते की तुझे वडील आम्हाला मदत करतील."

कैंटकी च्या गुलामांना पकडणारे लोक जंगली श्वानांसारखे आमच्या मागे लागले आहेत. आम्हाला लवकरात लवकर ही नदी ओलांडून कॅनडा ला पोहोचायचे आहे - जिथे गुलाम कायमस्वरूपी स्वतंत्र आहेत.



लूई ला माहित होते की इतक्या रात्री नदी पार करून जायचे म्हणजे त्याची आई नक्कीच चिंतीत राहील. आई ने लूई च्या वडिलांना देखील बजावून सांगितले होते की स्वतःला धोक्यात घालून गुलामांना नदी पार सोडणे त्यांनी आता बंद करावे. तिने हेही सांगितले होते की , " निर्वासित गुलामांवर लागू असलेल्या नव्या कायद्यानुसार त्यांना मदत करणाऱ्यांना ही कैदेची शिक्षा दिली जाईल."

तरीही वडिलांनी पुनःपुन्हा हा धोका पत्करला होता. त्यांचे म्हणणे होते की " मी कसं कुणाला गुलामी मध्ये पुन्हा परतायला भाग पाडू शकेन?"

" माझे वडील इथे नाहीत. " लूई ने सांगितले. "नदीवर बर्फ़ाची झालर तयार होण्यास सुरुवात झाली आहे , वारे जोरात आहे आणि नदी पार करायला सुद्धा कमीत कमी तीन तासाचा प्रवास करावा लागेल. "

“पण बाळ, पाणी खूप थंड आहे आणि इतक्या जोराच्या वाऱ्यात देखील आम्ही आधीच दोन नद्या पार करून इथपर्यंत आले आहोत.

डेट्रॉइट नदी ही स्वातंत्र्याची नदी आहे आणि आमच्यासाठी शेवटची संधी! “ महिला म्हणाली, “आमच्या मालकाने या मुलांच्या वडिलांना विकून टाकले. ते टायलर ला पण विकणार होते - जणूकाही तो एक मुलगा नाही, घोडा किंवा गाय आहे. जर तू आम्हाला नदी पार करण्यासाठी मदत करू शकला नाहीस तर आम्हाला या नदीत बुडून जीव देण्याशिवाय गत्यंतर नाही. "

तो मुलगा लूई कडे मोठ्या आशेने पाहत होता. भुवया उंचावत तो बोलला, " मी पैज लावून सांगतो की या अशा वातावरणात सुद्धा मी होडी नदी पार नेऊ शकतो."

त्या मुलाचे आव्हान लूई च्या हृदयाला आर-पार भेदून गेले. " नाही. तू नाही नेऊ शकणार. होडी नदी पार नेण्यासाठी नदीच्या लाटांचा प्रवाह आणि नदीचा उथळ भाग कुठे आहे हे माहिती हवे. "



महिला थंडीने कापत होती. छोटी मुलगी रडकुंडीला आली होती पण रडतानाही तिच्या तोंडून थोडासाही आवाज बाहेर निघत न्हवता. लूई ने स्वतःशी विचार केला की या मुलीला असे शांततेत रडणे देखील शिकावे लागले असेल, जेणे करून कोणी तिचा आवाज ऐकू नये.

लूई ला माहिती होते की अशा परिस्थितीत  बाबा असते तर त्यांनी काय केले असते. " तुम्ही थांबा, मी आलोच", तो म्हणाला.

खेत-घर की रसोई की गरमाहट लूई के गिर्द गरम कोट-सी लिपट गई। धधकते कोयलों पर केतली टंगी थी। उसने अपनी पसन्दीदा सफ़ेद मछली के शोरबे की गंध सूंघी। उस मछली को लूई ने ही पकड़ा था।

स्वयंपाकघरातील चुलीची ऊब लूई ला सुखावून गेली. धगधगणाऱ्या कोळशांवर एक किटली टांगली होती. त्याच्या आवडीच्या मास्यांच्या रस्श्याचा सुगंध सर्वत्र दरवळला होता. हे मासे लूई ने च पकडले होते.

"जेवण तयारआहे लूई", आई म्हणाली.

"होडीचे काम होत आले आहे मी ते पूर्ण करून लगेच येतो, मला फक्त एक उबदार स्कार्फ हवा होता म्हणून आलो आहे. "

त्या छोट्याशा घरात जिथे लूई ची झोपायची जागा होती, लूई ने त्या खोलीतील खिडकीचा दरवाजा उघडला आणि आपला गरम बिछाना, चादर, स्वेटर आणि उबदार जॅकेट खिडकीबाहेर फेकले.  त्यानंतर लुई धावत स्वयंपाकघरात आला आणि आईचा हात हातात घेऊन जोर-जोरात गाणे गात फेर धरून नाचू लागला.

'"चिव चिव चिमणे , अगं ये चिमणे  
काय रे चिमण्या?  
हे बघ आणलाय मोत्याचा दाणा  
बघु बघु बघु, पण ठेवायचा कुठे?"



जेव्हा गोल गिरक्या घालून आईचे डोके गरगरायला लागले तेव्हा ती खुर्ची ला टेकून उभी राहिली आणि जोरजोरात हसू लागली.

तिचे लक्ष नाही हे पाहताच लूई ने हळूच दोन-चार भाकऱ्या उचलल्या, ज्या आई ने थंड होण्यासाठी बुट्टीत ठेवल्या होत्या.



दरवाजाजवळ उभे राहून मागे पाहत तो आई ला म्हणाला, " जर मला परतायला उशीर झाला तर चिंता करू नकोस. शेवटी अंधार म्हणजे प्रकाशाचा विरुद्ध शब्द च ना ! मग कसली भीती ?"

आई हसली आणि म्हणाली, " तुझे बाबा पण नेहमी हेच म्हणतात ."

लूई ने सोबत आणलेले उबदार कपडे, चादर, मफलर आणि गरमा-गरम भाकऱ्या सारा आणि तिच्या मुलांना दिल्या. टायलर ने लूई चा गरम सदरा घातला आणि त्याला तो एकदम व्यवस्थित बसला ही!

"टायलर च्या बोलण्याचे वाईट वाटून नको हं घेऊ बाळा. तो थोडा हट्टी आणि फटकळच आहे. मी त्याला कितीदा समजावले की सगळे गोरे लोक सारखे नसतात. काही गोऱ्या लोकांमध्ये ही करूणा भाव असतो. इथे पर्यंत पोहोचण्यासाठी कित्येक गोऱ्या लोकांनी आमची मदत केली आहे."

बर्फाची पातळ चादर भेदत दोन्ही मुलांनी एकत्रितपणे नाव पाण्यात उतरवली आणि घट्ट पकडून ठेवली , जेणेकरून सारा आणि लूसी त्यामध्ये चढू शकतील.

"तुला खरंच नाव व्हलवायला येते?"  लूई ने टायलर ला विचारले.

"एकदम व्यवस्थित! मी मालकीण हर्मन ना मड तलावाच्या प्रत्येक कानाकोपऱ्यात फिरवून आणले आहे." तो म्हणाला.

लूई आणि टायलर ने फतवार (चप्पू - ज्याने नाव वल्हवली जाते ते फावडे) बोटीच्या खाचांमध्ये खोचून लॉक केले. पाण्यात नाव उतरली आणि तत्क्षणी नदीच्या उसळत्या लाटांनी जणूकाही तिला आपल्या कवेत घेतले. जी नदी दिवसा लूई ला आपली मैत्रीण वाटत असे, ती रात्रीच्या तुफान वातावरणात वैरीण वाटू लागली.

"नदीच्या प्रवाहाचा सामना करण्यासाठी आपल्याला नदीच्या वरच्या दिशेला सरकायला हवे" लूई ने टायलर ला सांगितले. जोराचा थंडगार वारा त्यांच्या चेहऱ्यावर मारा करत होता. शेतातील घरामधलया कंदिलाचा प्रकाश आता हळू-हळू मंदावत होता."

"तुम्ही इथंपर्यंत पोहोचलात कसे?" लूई ने सारा ला विचारले.

"आम्ही ओहायो नदी पार करून भुयारी रेल्वे मार्ग घेतला आणि एका स्टेशन पासून दुसऱ्या स्टेशन पर्यंत कसेबसे पुढे सरकत राहिलो."

"आम्ही ध्रुव ताऱ्याचा पाठलाग केला" लूसी म्हणाली.

"त्यांनी आमच्या मागे मोठं-मोठाले शिकारी कुत्रे सोडले होते" टायलर ने सांगितले.

सारा म्हणाली, " तुझ्यासारख्या कित्येक करुणामयी लोकांनी रस्त्यात आमची मदत केली, आम्ही उपाशी पोटी त्यांच्यापर्यंत पोहोचलो आणि त्यांनी आमचे पोट भरून मग निरोप दिला. "





पातळ बर्फाच्या लादीला भेदताना नाव लगबगत होती. दिवसा सागरी कुरव (समुद्र पक्षी - seagull) आणि इतर नावाडी लूई च्या सोबतीला असायचे. पण या कडाक्याच्या थंडीतल्या भयाण रात्री लूई ला वाटत होते की संपूर्ण जगात केवळ हेच चार लोक आहेत.

थंडीमुळे लूई चे दात कापू लागले होते आणि बोटे सुन्न झाली होती. लूसी ला थंडी पासून वाचवण्यासाठी सारा ने तिला घट्ट मिठी मारून आपल्या कुशीत ठेवले होते.

शेतातील घरातला कंदील तर केव्हाच दिसेनासा झाला होता. पण नदीच्या प्रवाहात आता एक दिवा दिसू लागला होता. गस्त घालणाऱ्या होडीचा हा कंदील होता. लूई चा घसा कोरडा पडला. भीतीची लाट त्याच्या मनात तरंगती. जर ते पकडले गेले तर लूई ला कैद होईलच पण सारा आणि तिच्या मुलांना इतक्या संघर्षानंतर पुन्हा गुलामगिरीत जावे लागेल.

" नाव चालवणे थांबव ", लूई ने हळूच टायलर ला सतर्क केले. "आपल्याला एकदम शांत राहायला हवे."



नाव चालवणे बंद करता क्षणीच नाव प्रवाहाच्या अनुसार कॅनडा च्या विरुद्‌ध दिशेने सरकू लागली. गस्त घालणारी होडी यांच्या अगदी जवळून गेली, इतक्या जवळून की त्या नावेत बसलेल्या लोकांचा आवाज यांना अगदी स्पष्ट ऐकू येत होता. पण त्यांच्या कंदिलाचा प्रकाश मात्र लूई ची नाव दाखवू नाही शकला.

गस्त घालणाऱ्या माणसांचा आवाज ऐकू येणे बंद होताच दोन्ही मुलांनी पुन्हा जोमाने नाव चालवणे सुरू केले.

उरलेले अंतर झपाझप पार करण्यासाठी त्यांचे मन इतके अटळ होते की नाव वल्हवून त्यांचे हात खूप दुखू लागले होते आणि तरीही त्यांनी पुढे सरकणे चालूच ठेवले. टायलर सुद्‌धा लूई सारखा चिंतेत होता. शेवटी शांतता भंग करत त्याने लूई ला विचारले," या नदीमध्ये तू कोणते मासे पकडतोस?"

"पांढरा मासा, हिल्सा, गोड्या पाण्यातली पर्च आणि स्टर्जन.  माझ्या बाबांनी तर एकदा चक्क ४० किलो वजनाची स्टर्जन पकडली होती!" लूई ने सांगितले.



" तो मासा खूप मोठा असतो, आणि त्याला पकडण्यासाठी बलाची आवश्यकता असते. कॅटफिश पकडायला तर आपल्याला अतिशय चतुराईने प्रयत्न करावा लागतो - त्यासाठी एक वजनदार गळ पाण्यात सोडायचा आणि मासा त्याला येऊन अडकला की तो पटकन वर खेचायचा. "

वाऱ्याचा ओघ त्यांच्या विपरीत वाहत होता आणि नदीवरील बर्फाचा थर आता अधिकाधिक जाडसर होऊ लागला होता. ते पुढे सरकण्याचा जितका प्रयत्न करत होते, असे वाटत होते की ते तितक्याच अंतराने मागे ढकलले जात आहेत. लूई ने इतकी भयाण थंडी पूर्वी कधीच अनुभवली न्हवती. बाबा समोर असते तर त्याने त्यांना विचारलं असतं की सर्वांनचा जीव धोक्यात घालून त्याने चूक तर नाही केली नं ? मुलांचे मनोबल वाढवण्यासाठी सारा ने एक गीत गायला सुरुवात केली आणि सर्वांनी तिची साथ देत ताल धरला .

*हे ईश्वर, हे प्रभू परमेश्वर,*

*मला बुडण्यापासून वाचव...*

*मी सांगते, माझी इच्छा काय आहे,*

*मला जमिनीत धसण्यापासून वाचव...*

*मी लाटांसोबत कधी वर उठते, तर कधी खाली जाते*

*मला बुडण्यापासून वाचव...*

*कधी मी पृथ्वीवर असते,*

*तर कधी मी वर आकाशात पाहते,*

*आणि आकाशात मला काय दिसतं?*

*साद घालणाऱ्या पऱ्यांचं अस्तित्व जाणवतं,*

*तू बस्स मला पाण्याखाली बुडण्यापासून वाचव...*

काही वेळाने लूई सुद्धा त्यांच्या सोबत गाऊ लागला. त्यांचे शब्द वाऱ्याचा प्रवाहात मिसळले होते आणि लाटांसारखे त्यांच्या मागोमाग वहात होते.

सर्वांना समोर काहीसा प्रकाश दिसला.

"आणखी एक गस्त घालणारी नाव आली की काय?" टायलर ने दबक्या स्वरात विचारले.

पण हा प्रकाश तर एका जागी स्थिर होता.

"अरे ! ही तर कॅनडा ची जमीन आहे!" लूई जल्लोषात ओरडला.

लूई आणि टायलर ने चप्पू (वल्हे) उचलून होडीत ठेवले. ते पाण्यात उतरले आणि नाव किनाऱ्याला खेचू लागले.

थोड्याश्या संकोचाने लूई ने जवळंच असलेल्या शेतातील घराचे दार ठोठावले. ही माणसे या परिवाराला शरण देतील का?

आतून एक वयस्कर महिला आणि पुरुष बाहेर आले आणि त्यांनी मोठ्या आदराने या सर्वांना घरात येण्यास सांगितले. आत मध्ये जाताच थंडीने गारठलेल्या या सर्वांना मायेची ऊब मिळाली आणि गरमा-गरम जेवण ही !

या भल्या जोडप्याने लूई ला विनंती केली की त्याने आज रात्री त्यांच्या घरीच मुक्काम करून सकाळी आपल्या घरी परतीचा प्रवास करावा.

"नाही! नाही! मला आजच परत जावं लागेल. आत्तापर्यंत आईला कळालं असेल की  नाव गायब आहे. जर मी आज रात्री परत घरी पोहोच लो नाही तर तिला वाटेल की मी पाण्यात बुडालो."

सारा ने लूई ला कडकडून मिठी मारली आणि लूसी सुद्धा त्याच्या पायाला घट्ट पकडून त्याला चिटकून उभी होती. दोन्ही मुलांनी एकमेकांना आलिंगन दिले.

"मी उन्हाळ्यात परतेन तेव्हा आपण स्टर्जन मासे पकडू." लूई ने शब्द दिला. आणि या परिवाराला मोठ्या संघर्षानंतर मिळालेल्या स्वातंत्र्यात मुक्त सोडून तो आपल्या घरी परत निघाला...



रात्रीच्या थंडी चे गार वारे त्याच्या चेहऱ्यावर सुयांप्रमाणे टोचत होते. लूई ला चप्पू ने बर्फाचा थर तोडून होडी पुढं सरकवायला अतोनात कष्ट घ्यावे लागत होते. त्याचे हात थंडी ने इतके गारठले होते की तो चप्पू नीट पकडू ही शकत न्हवता. पण प्रवास्यांची संख्या कमी झाल्यामुळे नाव आता आधीपेक्षा हलकी झाली होती. रात्रीच्या भयाण शांततेत लूई ला टायलर ची आठवण येत होती.

एकटेपणा सतावू नये म्हणून त्याने गाणे गाण्यास सुरुवात केली, "मला बुडण्यापासून वाचव..."
सारा आणि तिची मुलेही त्याला साथ देत आहेत अशी लूई ने कल्पना केली.

दूर नदी किनारी त्याला त्याच्या घरातील कंदिलाचा प्रकाश अंधाराला चिरून त्याच्यापर्यंत पोहोचताना दिसला. त्याने चप्पू पाण्यात खोलवर रोऊन बर्फ दार सारला.

त्याची आई किनाऱ्यावर त्याची वाट पाहत उभी होती. लूई ने किनाऱ्यावर पाय ठेवताच तिने त्याला घट्ट मिती मारली.

लूई ने आई ला सारा , लूसी आणि टायलर बद्दल सांगितले.

"जेव्हा बाबा घरी परततील," लूई म्हणाला, " तेव्हा मी त्यांना सांगेन की मी तेच केले जे तुम्ही केले असते."



# लेखिकेच्या लेखणीतून

## ग्लोरिया व्हेलन

त्या कालावधीत जवळ-जवळ 40,000 गुलामांनी भुयारी रेल्वे मार्गाने प्रवास केला होता. त्यातील कित्येक नशीबवान गुलामांच्या स्वातंत्र्याचा मार्ग त्यांना डेट्रॉइट नदी पार करून कॅनडा ला घेऊन गेला होता.

नंतर या साहसी प्रवाश्यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ डेट्रॉइट च्या रिवर फ्रंट प्रोमेनेड च्या हार्ट प्लाज़ा मध्ये 'गेटवे टू फ्रीडम' नामक एक स्मारक बनविण्यात आले. या 12 फूट उंच कांस्य धातू ने बनवलेल्या स्मारकामध्ये आठ व्यक्ती डेट्राइट नदी च्या पलीकडील कॅनडा च्या विन्डसर, ऑन्टोरियो कडे पाहत असताना दर्शवले गेले आहे.

तिकडे कॅनडा मध्ये विन्डसर सिविक एसप्लनेड मध्ये 22 फूट उंच 'टावर ऑफ फ्रीडम' स्मारक आहे, ज्यामध्ये कांस्य धातूची 'फ्लेम ऑफ फ्रीडम' भुयारी रेल्वे रोड मध्ये कॅनडा च्या हिस्सेदारी बद्दल अभिमानास्पद आठवण म्हणून उभी केली आहे.



# वॉशिंग्टन चा बस प्रवास

## - 1963 ची स्वातंत्र्य चळवळ



लेखन: ग्वैनेथ स्वेन

चित्रांकन: डेविड गाइस्टर

भाषांतर: पल्लवी सतीश पाटील

मला माहिती आहे की ते मला वॉशिंग्टन कडे जाणाऱ्या बस मध्ये का बसवत आहेत. मी पुन्हा एकदा अडचणीत असल्याचा हा इशारा आहे.

या बस ची पाटी म्हणजे "मोठ्या अक्षरात लिहिलेला धोका" आई नेहमी म्हणायची. आणि हे सांगत असताना बहुतांशी वेळा तिच्या चेहऱ्यावर एक स्मितहास्य असायचं. पण कधी मी चुकून जरी बसचा जाळीचा दरवाजा जोरात बंद केला आणि माझ्या जुळ्या भावंडाना उठवलं , तर मात्र तिच्या चेहऱ्यावरचं ते हसू मला शोधूनही सापडायचं नाही.

बाबांची बिलकुलच इच्छा नाही की मी वॉशिंग्टन ला जावे. पण तरीही असं वाटतंय की मला तिकडे जावेच लागणार.

मला झोप लागली आहे असे समजून बाबांनी एका रात्री आईला सांगितले," कित्येक लोक डॉ. किंग यांचे भाषण ऐकण्यास जात आहेत. पण मला वाटतं जेन ला घेऊन जाणं बरोबर नाही. ती तापट आहे."

तुम्हाला माहिती आहे याचा अर्थ काय आहे? मला वाटतं त्यांना म्हणायचं होतं की मला पटकन राग येतो.

थोडक्यात काय तर मी च एक संकट आहे.

आई ने ही त्यांना साथ देत म्हटले की, " ही मुलगी इतकी मोठी अडचण आहे की मी एकटी तिला सांभाळू शकत नाही. आणि त्यात या जयला मुलांचे पण दात येऊ लागले आहेत.

त्यामुळे मी वॉशिंग्टन ला जात आहे, घरापासून शेकडो मैल दूर. मला या संभाषणातून हे तर कळाले की मी का चालले आहे, पण हे नाही समजले की बाबा का जात आहेत?



इंडियानापोलिस मध्ये आमच्या भागात colored म्हणजे काळे/गौरवर्णीय लोक नाहीत. मी त्यांना फक्त टीव्ही वर पाहिले आहे. पण टीव्ही वर दाखवले जाणारे काळे लोक जास्त करून दक्षिणेकडे राहतात. त्यांच्यावर अग्निशामक दलाच्या आग विझवण्यासाठी वापरल्या जाणाऱ्या पाईप मधून पाण्याचा मारा केला जातो आणि पोलिसांचे डॉग्स त्यांचा पाठलाग करून त्यांच्यावर हमला करताना टीव्ही वर दाखवले जातात.

बाबा डॉ. मार्टिन लूथर किंग यांचे भाषण ऐकण्यासाठी वॉशिंग्टन जात आहेत. कारण त्यांना वाटतं की आपण सर्वांनी मिळून-मिसळून शांतीने राहायला हवं. बाबा मला नेहमी म्हणतात, "आपण इतिहास बघतोय जेनी, इतिहास!"

मी शाळेत इतिहासाचा अभ्यास करते, विश्वास ठेवा, मला तो खूपच कंटाळवाणा वाटतो. आणि इंडियानापोलीस सोडून जाणे पण खूप कंटाळवाणे आहे.

मंगळवारी शहराच्या वॉकर थिएटर जवळ काही जुन्या बसेस आमच्या साठी उभ्या आहेत. त्यावर पाट्या लिहिल्या असतात - क्रिस्पस एटक्स स्कूल आणि रोलिन्स ग्रोव ए. एम.आय चर्च. त्यामध्ये बसलेले काळ्या/गौर वर्णीय लोकांनी एकदम चकचकीत नवे कपडे घातले होते , जणूकाही शाळेचा पहिला आहे किंवा ईस्टर चा सण !






मला वाटलं की मी पुन्हा एकदा अडचणीत सापडणार आहे. कारण मी माझ्या आवडीचा फ्रॉक घातला होता. पण बाबांच्या रंगाऱ्यांच्या टीम मधले पॉल टायलर यांनी माझ्याकडे पाहून स्मितहास्य केले.

"तुम्हाला भेटून खूप आनंद झाला" त्यांच्या पत्नी म्हणाल्या. त्यांनी मिसेस कैनेडी यांच्यासारखी हॅट घातली होती आणि त्याला मॅटचिंग सूट पण. "तुझा फ्रॉक तर एकदम मस्त आहे गं !" त्या म्हणाल्या.

तिथे सर्व वयातील आणि वर्गातील लोक होते - अगदी लहानांपासून ते वृदधांपर्यंत, शेतकऱ्यांपासून ते धर्मगुरूंपर्यंत.

बाबा आणि थोडेसे गोरे लोक खूप साऱ्या काळ्या/गौर वर्णीय लोकांसोबत. मी इतक्या साऱ्या काळ्या लोकांना एकत्रितपणे एका ठिकाणी कधी पाहिलेच न्हवते.

जेव्हा बस मध्ये चढण्याची वेळ आली तेव्हा मला खूप आनंद झाला.



उन्हाळा असूनसुद्धा मी बाबांना चिकटून बसले होते. आम्ही आमच्यासोबत फक्त एकवेळचे जेवण आणले होते. पण रात्र होता होता आम्ही सर्व पुन्हा भुकेले होतो. आम्ही दोन-तीन वेळेस बसमधून उतरलो पण प्रत्येक वेळेस पॉल टायलर आणि बस चालक हॉटेल मध्ये गेले आणि मान डोलावत बाहेर आले.

"मिश्र-प्रकारच्या लोकांसाठी आमच्या हॉटेल मध्ये काहीही सोया होणार नाही", असे त्यांनी सांगितल्याचे पॉल ने स्पष्ट केले.

"आपण आत का नाही जाऊ शकत?", मी बाबांना हळूच विचारले. "तुम्ही आणि मी तर 'मिश्र-श्रेणीचे' नाही"

"जेव्हा सोबत दुसरे कुणी खाऊ नाही शकत, तू एकटी जेवणे पसंत करशील?", बाबांनी विचारले.

खरं तर मी इतकी भुकेली होते की कुठेही आणि काहीही खाऊ शकत होते. पण मला बाबांचं म्हणणं पण पटले. सर्वांसोबत मिळून-मिसळून राहणेच योग्य होते. मी काळ्या लोकांचे निरीक्षण करत होते- त्यांचे आचरण अजिबात असे न्हवते के ते कोणताही हल्ला-गुल्ला किंवा अडचणी निर्माण करतील.

आणि अडचण म्हणजे काय हे मला चांगलेच माहिती होते.



पोटातील आग जाणवू नये म्हणून लक्ष विचलित करण्यासाठी पॉल टायलर ने गाणे गायला सुरुवात केली. गीताचे बोल सर्वांना माहिती होते , पण मी मात्र अडखळत होते :

*"आपली छोटीशी ही ज्योती चमकू देईन मी,*
*आपल्या छोट्याशा या प्रकाशाला उजळून देईन मी..."*

आम्ही शेत, शहर, नद्या आणि डोंगर पार करून पुढे सरकत होतो. गाडीच्या चाकांच्या सततच्या संथ आवाजात मला इतकी गाढ झोप लागली होती की मी उठले ते थेट एका मोठ्या धक्क्याने. वाहन चालकाने ब्रेक दाबून गाडी पेट्रोल पंपावर उभी केली होती. बाबांच्या घड्याळात रात्रीचे बारा वाजले होते.



"मिसेस टायलर पुढे बस चालकाकडे काही विचारण्यासाठी गेल्या.
मला फक्त चालकाचं उत्तर ऐकू आलं, "नाही मॅडम," त्याने म्हटलं, "मी तुम्हाला इथे उतरू देऊ शकत नाही.'"

चालकाने शौचालया वर असलेल्या पाटीवर लिहिलेले शब्द वाचवून दाखवले. त्यावर 'काळ्या लोकांना प्रवेश नाही' असं लिहिलं होतं. त्या चिडून बोलल्या, "मी जात आहे."

त्यांचा आवाज ऐकून मी उठले. अचानक, मला सुद्धा बाथरूम ला जायची तीव्र इच्छा झाली.

"सर," मी चालकाला म्हटलं,"मला पण जायचे आहे."

"तुम्ही मोठ्या अडचणीत येऊ शकता, मॅडम" ,चालकाने चेतावणी दिली.

"मला जावे लागेल", मी पुन्हा म्हटलं.

मिसेस टायलर आणि मी हातात हात घालून पेट्रोल पंपाकडे गेलो. तिथे एक दुबळ्या अंगकाठीचा मुलगा काउंटरच्या मागे जागा राहण्याचा प्रयत्न करत बसला होता. "बाळ", मिसेस टायलर म्हणाल्या, "आम्हाला महिलांच्या कक्षाची चावी हवी."

त्यांच्या आवाजाने त्या मुलाला खडबडून जागं केलं. त्याने आधी त्यांना निरखून पाहिलं, आणि मग मला सुद्धा.

"‘मी ... मी तुम्हाला तिथे प्रवेश देऊ शकत नाही,’’ त्याने मिसेस टायलरला सांगितलं. मिसेस टायलरचा हात माझ्या हाताला घट्ट पकडून होता.

"होय, देऊ शकता," मी म्हटलं.

दोघांनी मला आश्चर्याने पाहिलं.

"निश्चितच ", मी बोलत राहिले, "माझे आई-बाबा मला नेहमी सांगतात की आपण योग्य निर्णय घ्यायचा की नाही हे पूर्णतः आपल्याच हातात असते."( पण मी हे नाही सांगितलं की मी कोणत्यातरी अडचणीत सापडल्यानंतर ते मला हे सांगतात)

मुलगा थोडासा गडबडला, त्याने खाली पाहिले.

मी अशी बोलत राहिले की जणू कुणा जुन्या मित्राशीच बोलतेय, "आई म्हणते की मी अनेक चुकीचे निर्णय घेते, पण मला असं वाटतं की या वेळी आत जाऊ देणं हा योग्य निर्णय असेल."

मुलगा लाजून लालबुंद झाला. त्याने घसा खाकराला, मग दुसऱ्या बाजूला पाहत त्याने चावी आमच्या दिशेने सरकवली, जणू काही चुकून समोर ठेवली असेल."



शौचालयात एका मशीन वर एक मोठा टॉवेल लटकवला होता. तो पकडण्यासाठी मी जितक्या उंच उडी मारता येईल तितक्या उंच उडी मारली पण माझी उंची अपुरी पडत होती. मिसेस टायलर यांनी त्यांचे केस सावरत मला पाहिले आणि गालातल्या गालात हसल्या.

चावी परत करताना आम्ही त्या मुलाचे आभार मानले. पण त्याने  काहीतरी कामात गुंतून  आपले लक्ष नसल्याचे नाटक केले. त्याने आमच्या धन्यवादाला प्रत्युत्तर पण दिले नाही.



बस चा प्रवास पुन्हा सुरु होताच मिस्टर टायलर नी गायला सुरुवात केली,

*"चला मुलांनो एकत्र या !*

*चला मुलांनो एकत्र या !*

*चला मुलांनो एकत्र या !*

*माणसांच्या हक्कांसाठी लढा द्यायला, चला मुलांनो एकत्र या !"*

या वेळेस गीताचे बोल मला स्पष्टपणे समजले आणि मी सोबत गाणे गायला सुरुवात केली.

जेव्हा अखेर आमची बस एका मोठ्या मैदानावर थांबली, तेव्हा दिवस उजाडला होता. मी माझ्या आयुष्यात इतकी सारी वाहने पाहिली न्हवती. वातावरण असं होतं की जणू काही मोठी बास्केटबॉल स्पर्धा चालू होती.

“सुप्रभात,” मिसेस टायलरने बसमधून उतरताना आम्हाला म्हटले.

“वातावरण तर एकदम छान आहे,” बाबांनी बाहेर डोकावत म्हटले.

आमच्याकडे पाहून कुणालाही पटलं नसतं की आम्ही बसमध्ये एक संपूर्ण दिवस आणि रात्र घालवली आहे. आमचे चेहरे इतके खुलले होते की जणूकाही आम्ही त्याच पहाटे जागे झालो होतो, स्वप्न आम्ही इतक्या दिवसांपासून पाहत होतो.

नंतर जेव्हा डॉ. किंग बोलत होते, तेव्हा आम्ही सर्व गर्दीत उभे होतो. आम्ही रंगमंचापासून कित्येक मैल दूर होतो, पण तुम्ही विश्वास ठेवाल का? मला असं वाटलं की ते थेट माझ्याकडेच बघत आहेत.

डॉ. किंगचं भाषण छान होतं. त्यांचं बोलणं मला संगीतासारखं मधुर वाटलं. पण मी विचार करू लागलेः ते मला त्यांच्या स्वप्नाबद्दल का सांगत आहेत? माझा त्याच्याशी काय संबंध आहे बरं ?

तेव्हा मला माझ्या खांद्यावर एक सौम्य हाताचा स्पर्श जाणवला. मिसेस टायलरने त्यांच्या चेहऱ्यावरच्या वाहणाऱ्या अश्रूंनी भरलेल्या डोळ्यांनी मला पाहिलं.

आणि मला समजलं की ते स्वप्न फक्त डॉ. किंग किंवा मिसेस टायलर आणि त्यांच्या पतीचं नव्हतं, तर ते माझं , माझ्या बाबांचं, आणि कदाचित पेट्रोल पंपावरील त्या मुलाचं सुद्धा होतं.



# लेखिकेच्या लेखणीतून

## ग्वैनेथ स्वेन

28 ऑगस्ट 1963 च्या दिवशी पहाट होताच एकामागोमाग बस येऊ लागल्या होत्या. त्या लांब-लांबच्या रांगा बम्परला बम्पर स्पर्श करत, हवा येण्यासाठी उघड्या खिडक्यांसह उभ्या होत्या. दिवस उकाड्याचा आणि दमट होणार होता. पण त्या बसमधून उतरलेल्या हजारो लोकांना याची फारशी काळजी नव्हती. त्यांनी आदल्या रात्री झोपही पूर्ण घेतलेली नव्हती, पण त्याची त्यांना पर्वा नव्हती.

माझ्या बाबांना जे आठवतं त्यानुसार, संपूर्ण वातावरण एक उत्सवासारखं होतं, आणि "शांततेचा खुशाल अनुभव सर्वत्र पसरला होता." माझे वडील आणि आजोबा, दोघेही गोरे पुरुष, डॉ. किंग आणि इतरांना ऐकण्यासाठी मध्य इंडियानापासून बस ने वॉशिंगटनमध्ये पोहोचले होते.

त्या वेळी मी फक्त दोन वर्षांची होते. पण मी बराच काळ विचार करत राहिले की, जर मी वॉशिंगटनच्या त्या मोहिमेत एक लहान मुलगी असूनही सामील झाले असते, तर मला कसं वाटलं असतं बरं?

इतिहासाच्या पुस्तकांमध्ये वॉशिंगटनच्या चळवळीला डॉ. मार्टिन लूथर किंग जूनियर यांच्या प्रसिद्ध भाषण, "माझे स्वप्न आहे ..." यासाठी सर्वाधिक लक्षात ठेवले जाते. पण जे लोक बसने प्रवास करून तिथे पोहोचले होते, वॉशिंगटनच्या लिंकन मेमोरियलवर त्या 200,000 लोकांच्या गर्दीने, डॉ. किंगच्या भाषणाच्या आधीच इतिहास रचला होता. ज्या क्षणी लोक इंडियानापोलीस, मेम्फिस, शिकागो आणि अनेक इतर शहरांमधून बसमध्ये चढले होते- काळे आणि गोरे, ख्रिश्चन, मुस्लिम आणि यहूदी - त्याच क्षणी सर्वांनी शांततेत एकजूट होण्याचे स्वप्न साकार होण्यास सुरुवात झाली होती.

आणि त्या सकाळी वॉशिंगटन डी.सी.मध्ये ते लोक आणि त्यांचं स्वप्न त्यांच्या ध्येयापर्यंत  पोहोचलं होतं.



कवियत्री आणि अनेक पुरस्कार प्राप्त बालसाहित्य लिहिणाऱ्या **ग्लोरिया व्हेलन** यांना किशोर वयीन मुलांसाठी लिहिलेल्या त्यांच्या उपन्यास "होमलैस बर्ड"साठी नॅशनल बुक अवॉर्ड मिळाला होता. त्यांच्या रचनांमध्ये "यूकी एण्ड द वन थाउसैण्ड कॅरियर्स" आणि "यटान्डाउ" यांचा समावेश आहे. मिस व्हेलन मिशिगनमध्ये लेक सेंट क्लेयरच्या जवळ राहतात.

**ग्वैनेथ स्वेन** यांना त्यांच्या कथांमध्ये पारिवारिक गोष्टी आणि इतिहासासोबत गुंफणे आवडते. त्यांच्या रचनांमध्ये "होप एण्ड टियर्स", "एलिस आइलैंड वॉयसेस", "चिग अँड द सेकंड स्प्रेड" आणि "आई वंडर ऍज आय वॉंडर" यांचा समावेश आहे. त्या सेंट पॉल, मिनियापोलिसमध्ये राहतात.

**हाइसबर्ट फॉन फ्रंकनहायझन** यांनी "स्लीपिंग बेअर प्रेस" साठी 20 हून अधिक पुस्तकांची चित्रांकन केले आहे. त्यांच्या चित्रित पुस्तकांमध्ये "टी इझ फॉर टायटैनिक", "एल्फाबेट", "मैकिनैक ब्रिज: द फाइव माईल पोयम" आणि बेस्टसेलर "द लेजेंड ऑफ द स्लीपिंग बेअर" यांचा समावेश आहे. ते बाथ, मिशिगनमध्ये राहतात.

**डेविड गाइस्टर** हे नाट्य आणि अमेरिकन इतिहासाचे अभ्यासक आहेत, आणि त्या कहाण्या त्यांच्या चित्रकलेला प्रेरित करतात. त्यांच्या पुस्तकांमध्ये "बी इझ फॉर बैटलक्राय", "अ सिविल वॉर एल्फाबेट" आणि "सर्वाइव्हिंग द हिंडनबर्ग" यांचा समावेश आहे. ते मिनियापोलिस, मिनेसोटा मध्ये राहतात.

**माइक बैनी** यांनी रेखाटलेली चित्रे "टाइम", "द न्यू यॉर्कर" आणि "स्पोर्ट्स इलस्ट्रेटेड" मासिकांमध्ये प्रकाशित झाली आहेत. त्यांना सोसायटी ऑफ इलस्ट्रेटर्सने तीन सुवर्ण पदके आणि दोन रजत पदके बहाल केली आहेत. ते ऑस्टिन, टेक्सासमध्ये राहतात.